**उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या एकत्रित निर्णय आधार प्रणालीसाठी सल्लागाराची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. युपोनि-२०२२/प्र.क्र.०३/नोंदणी शाखा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- २० मे, २०२२

वाचा:-

१) माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, शासननिर्णय, क्र. सामान्य प्रशासन विभाग- मातंसं ०८०/०४/२०१४ मातंसं दि.२०/०३/२०१८.
२) माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, शासननिर्णय, क्र. सामान्य प्रशासन विभाग- मातंसं ०८/०४/२०१४ मातंसं दि.०९/०५/२०१९.
३) माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, शासनशुद्धीपत्रक, क्र. सामान्य प्रशासन विभाग- मातंसं ०८०/०४/२०१४/O/O मातंसं दि.१९/०३/२०२१.

प्रस्तावना :-

उच्च व तंत्र शिक्षण विभागासाठी एकत्रित निर्णय आधार प्रणालीसाठी सल्लागार कंपनीची नियुक्ती करण्यासाठी दि. १८.०२.२०२२ व दि. २२.०२.२०२२ रोजी प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत सादरीकरण घेण्यात आले. या सादरीकरणात ३ सल्लागार कंपन्यांनी भाग घेतला. सदर सादरीकरणाचे मुल्यांकन तज्ञाकडून करण्यात आले. त्यानुसार विभागासाठी M/s Price Warehouse Coopers ( PWC ) ची नेमणूक करण्याचा निर्णय घेण्यात आला.त्यानुषंगाने सल्लागार नियुक्तीचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

प्रकल्प अंमलबजावणी समितीने घेतलेल्या निर्णयास अनुसरुन ई गव्हर्नन्स सल्लागारम्हणून M/s Price Warehouse Coopers ( PWC )ची नियुक्ती याव्दारे **सहा महिन्यांसाठी** करण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्पासाठी आवश्यक असणाऱ्या सल्लागारांबाबतचा तपशील खालीलप्रमाणे:-

| अ.क्र | सल्लागाराचा प्रकार | नियुक्तीचा प्रकार | सल्लागाराची संख्या | नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | व्यवस्थापकीय सल्लागार | पूर्णवेळ | २ | मुंबई |
| २ | वरिष्ठ सल्लागार | पूर्णवेळ | १ | मुंबई |

३. उपरोक्त सल्लगारांच्या संख्येत आवश्यकतेनुसार वाढ किंवा घट करण्याचा अधिकार विभागास राहिल. तसेच सध्याची नियुक्त सल्लागार कंपनी विभागाच्या स्वेच्छाधिकारात मुदतवाढीस पात्र असेल.

४. नियुक्तीच्या अनुषंगानेसामान्य प्रशासन विभाग-माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भी दि.०९/०५/२०१९ च्या शासन निर्णयात नमुद केल्यानुसार, सल्लागार कंपनीची जबाबदारी असेल. तसेच संदर्भीय शासन निर्णय-दि. २० मार्च, २०१८, दि.०९ मे,२०१९ आणि शासनशुद्धीपत्रक दि. १९ मार्च, २०२१ अन्वये देण्यात आलेल्या सुचनांचे अटी व शर्तीचे पालन करणे सल्लागार कंपनीस बंधनकारक राहिल.

५. नियुक्तीच्या अनुषंगाने आवश्यक अटी शर्तीसह सविस्तर कार्यादेश स्वतंत्रपणे देण्यात येतील.

६. सदर सल्लागारांना महिती व तंत्रज्ञान विभागाने संदर्भीय दि. ०९/०५/२०१९ अन्वये विहित केल्यानुसार शुल्क अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. सदरचा खर्च मागणी क्र. डब्ल्यू-६ "२२५१ सचिवालयीन सामाजिक सेवा, ०९० सचिवालय, (०१)उच्च व तंत्रशिक्षण विभाग (०१) (०१) उच्च व तंत्रशिक्षण विभाग (अनिवार्य) ( २२५१०४०९) २८, व्यावसायिक सेवा" या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५२०१७४७३३२३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2022.05.20 17:50:13 +05'30'

**( प्र. पां. लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) मा.राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिवमंत्रालय, मुंबई,
६) मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग ( माहिती व तंत्रज्ञान) मंत्रालय, मुंबई
९) सर्व सहसचिव /उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुबई.
१२) संचालक कला महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) संचालक, ग्रंथालय महाराष्ट्र राज्य, मुबई.
१४) सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) M/s Price Warehouse Coopers Private ltd, (PWC), २५२, वीर सावरकर मार्ग, शिवाजी पार्क, दादर (प) मुंबई ४०००२८.
१६) निवडनस्ती नोंदणी शाखा , उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.